कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोव्हिड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.

कै.लक्ष्मण दुलाजी बेले, वाहन चालक

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२४/प्र.क्र.६६९/सेवा-५**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.

**दिनांक: ०४ जुलै, २०२४**

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०.
२. संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांचे पत्र क्र.ससंआसे/कोवीड-१९/कक्ष-५८/विक/कै.बेले/२१०१०-१६/ २०२४, दि.२९.०६.२०२४

**शासन निर्णय :-**

संदर्भाकित क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय, दि.२९.०५.२०२० अन्वये कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावतांना कोव्हिड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू होणाऱ्या कर्मचाऱ्यांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

२. संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांनी मयत श्री.लक्ष्मण दुलाजी बेले, प्राथमिक आरोग्य केंद्र, मसोड, ता.कळमनुरी, जि.हिंगोली यांच्या कुटुंबियांना वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० अनुसार रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. प्राथमिक आरोग्य केंद्र, मसोड, ता.कळमनुरी, जि.हिंगोली येथे कार्यरत असलेले मयत कै.लक्ष्मण दुलाजी बेले, वाहन चालक यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य पार पाडताना कोरोना विषाणू संसर्गाने दि.०२.०५.२०२१ रोजी मृत्यू झाला आहे. मयत श्री.बेले यांच्या सेवा कोव्हिड-१९ विषाणूच्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने मदतकार्य यामध्ये समाविष्ट होत आहेत. मयत श्री.बेले हे रुग्णालयात

दाखल होण्यापूर्वी १४ दिवस कर्तव्यावर हजर होते. श्री.बेले यांचा मृत्यू कोव्हिड-१९ मुळे झाला असल्याचे वैद्यकीय अधिकारी, उप जिल्हा रुग्णालय, कळमनुरी, जि.हिंगोली यांनी प्रमाणित केले आहे.

४. त्यानुसार, प्राथमिक आरोग्य केंद्र, मसोड, ता.कळमनुरी, जि.हिंगोली येथे कार्यरत असलेले मयत श्री.लक्ष्मण दुलोजी बेले, वाहनचालक यांच्या कुटुंबियांना रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेचे सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास या आदेशाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

५. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण-२०२०/प्र.क्र.व्यय-९, दि.२९.०५.२०२० मधील तरतूदीनुसार मयत श्री.लक्ष्मण दुलोजी बेले, वाहनचालक या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबास या संदर्भातील तरतूदी व नियम विचारात घेऊन सानुग्रह सहाय्य अदा करण्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांची राहील.

६. प्रस्तुत खर्च **२२१० ५०४१ (३६)** या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२४०७०४१२४५३३५६१७** असा आहे. सदर शासन निर्णय हा डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL MAHADEV KUMERIYE

Digitally signed by ANIL MAHADEV KUMERIYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7de2c699c260e8b545f2736f6acef82da11a2da0a65565e5bcb99995bc112fe6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C4770170FA4EC3BAEC96D0FA6B787BC46960639B94799F693E5F126CA6F1AF70, cn=ANIL MAHADEV KUMERIYE
Date: 2024.07.04 18:02:31 +05'30'

**(अनिल कुमेरीये)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.

५. सहाय्यक संचालक (लेखा व लेखापरिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
७. वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
८. अवर सचिव (अर्थसंकल्प/लेखा), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. श्रीम.निलाबाई लक्ष्मण बेले, रा.असोलवाडी,पो.मसोड,ता.कळमनुरी, जि.हिंगोली.
१०.निवडनस्ती, सार्वजनिक आरोग्य विभाग (सेवा-५).